**महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण - २०२१ अंतर्गत मागणीविषयक प्रोत्साहने आय.सी.आय.सी.आय. बँकेमार्फत वितरीत करण्याची कार्यपध्दती आय.सी.आय.सी.आय. (ICICI) बँकेमार्फत राबविण्यास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एमव्हीडी-०९२१/प्र.क.२५५/परि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :**

१) पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, शासन निर्णय क्र.मइवाधो-२०२१/ प्र.क्र. २५/ तां.क.४, दिनांक २३.०७.२०२१.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/ प्र.क्र.८४/ कोषा प्रशा-५, दिनांक १५.०९.२०२१ व दिनांक ०७.१०.२०२१.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.५१/ २०/ कोषा. प्रशा-५, दिनांक ०३.०३.२०२१.
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.एमव्हीआर-०७२१/सीआर-६१८/ का.२ (३)/ जा.क्र. १४२६२, दिनांक २४.११.२०२१.

**प्रस्तावना :-**

उपर्निर्दिष्ट क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र इलेक्ट्रीक वाहन धोरण, २०२१ जाहीर करण्यात आलेले आहे. उपर्निर्दिष्ट क्र.२ येथील शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत योजना तसेच राज्यांच्या विविध योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन करण्याच्या अनुषंगाने प्रशासकीय विभागांना विविध बँकेमध्ये बँक खाते उघडण्याबाबत मान्यता दिली आहे. त्यात आय.सी.आय. सी. आय. (ICICI) बँकेचाही समावेश आहे. ही बाब विचारात घेऊन, महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण २०२१ ची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने मागणीविषयी प्रोत्साहने इलेक्ट्रिक वाहन उत्पादकामार्फत खरेदीदारास वितरीत करण्याची ऑनलाईन कार्यपद्धती आयसीआयसी बँकेमार्फत राबविण्याकरीता आयसीआयसीआय (ICICI) बँकेत नवीन खाते उघडणेबाबत मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण, २०२१ अंतर्गत मागणीविषयक प्रोत्साहने इलेक्ट्रिक वाहन उत्पादकामार्फत खरेदीदारास वितरीत करण्याची ऑनलाईन कार्यपध्दती राबविण्यासाठी परिवहन

आयुक्त कार्यालय, मुंबई या कार्यालयास आय.सी.आय.सी.आय. (ICICI) बँकेत नवीन खाते उघडण्यास खालील नमूद अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

अ) सदर बँकेमध्ये T+१ पेक्षा जास्त कालावधीसाठी निधी असंवितरीत ठेवता येणार नाही. असा असंवितरीत निधी त्वरीत शासनास परत करण्याची दक्षता घेण्याची जबाबदारी परिवहन आयुक्त, मुंबई यांची राहील.

ब) उपर्निर्दिष्ट क्र. ३ येथील शासन निर्णय दिनांक ३ मार्च, २०२१ मधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करणे अनिवार्य राहील.

क) या प्रकरणी वित्तीय औचित्याच्या सूत्राचे पालन व्हावे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ १६/२०२२/को.प्र-५, दिनांक ०३.०२.२०२२ अन्वये दिलेली मान्यता व त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२११६१००९४९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2022.02.21 16:12:30 +05'30'

**( भ. रा. लांघी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, १/२, मुंबई / नागपूर.
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. उप सचिव (को.प्र. ५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी (परिवहन-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (परि-४).